**रस्ते विकासासह पायाभूत विकासासाठी सहकारी कारखान्यांना सहायक अनुदान या योजने अंतर्गत सन २०१६-१७ ह्या आर्थीक वर्षासाठी मंजूर अनुदान वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ससाका २०१५/प्र.क्र. २४२/२५ स,**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : ३०.०३.२०१७

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक-ससाका-३१९०/३८९२७/३७३/३-सी,दिनांक ४ जानेवारी,१९९२.
२) शासन निर्णय क्रमांक-ससाका-१००८/प्र.क्र.५८/२५-सी,दिनांक १२.३.२००८
३) साखर आयुक्त कार्यालयाचे क्रमांक-साआ/तांत्रिक शाखा/कक्ष-१५/४६२/सन २००६ दिनांक ४.१.२००६ चे आदेश.
४) साखर आयुक्त कार्यालयाचे क्रमांक-साआ/ अर्थ ३ / कक्ष ६/ रस्ते अनु.११-१२ /११ दि.१.६.२०११ चे आदेश.
५) शासन परिपत्रक ,वित्त विभाग , क्रमांक - अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६
६) शासन परिपत्रक ,वित्त विभाग , क्रमांक - अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. ८.२.२०१७
७) साखर आयुक्त कार्यालय यांचे जा.क्र.साआ/कक्ष-६/अर्थ ३/ रस्ते अनुदान /२०१६-१७ / स सा का / १७ / ७८८० दि. ६.१.२०१७ .

## शासन निर्णय

रस्ते विकासासह पायाभूत विकासासाठी सहकारी कारखान्यांना सहायक अनुदान ( २४२५१०३६) या योजनेसाठी सन २०१६-१७ च्या सुधारित अर्थसंकल्पीय अंदाजपत्रकात मंजूर रु.१,८०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी ऐंशी लाख फक्त) तरतूद साखर आयुक्त यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे प्रथम प्राप्त प्रथम प्राधान्य याप्रमाणे खालील २ सहकारी साखर कारखान्यास अदा करण्यास खालील अटी व शर्तीची पूर्तता करण्याच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | सहकारी साखर कारखान्याचे नाव | मंजूर रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | मुळा सहकारी साखर कारखाना , अहमदनगर | १,२७,८७,९१६,/- |
| २ | भाऊराव चव्हाण सहकारी साखर कारखाना , नांदेड | ५२,१२,०८४/- |
| | एकूण रुपये एक कोटी ऐंशी लाख फक्त | १,८०,००,०००/- |

(१) सदर मंजूर अनुदानाची रक्कम,कारखाना परिसरातील ज्या रस्त्यांची दुरुस्ती बांधकाम करण्यासाठी मंजूर करण्यात आलेली आहे, त्याच कारखान्यासाठी खर्च करण्यांत यावी. तसेच सदरचे अनुदान ज्या आर्थिक वर्षाकरिता मंजूर करण्यात आले आहे त्याच आर्थिक वर्षात वापरण्यात यावे. कांही

अपरिहार्य कारणास्तव सदर खर्च त्याच आर्थिक वर्षात करणे शक्य नसल्यास तसे लेखी आवेदन साखर आयुक्त कार्यालयास देवून मुदतवाढीसाठी पुर्व मंजूरी घेण्यात यावी. सदर मुदतवाढ ही एकदाच एका आर्थिक वर्षासाठी दिली जाईल व सदर बाब कारखान्यांवर बंधनकारक राहील. सदर मुदतीत किंवा वाढीव मुदतीत कारखान्याने अनुदानाच्या रक्कमेचा विनियोग केला नाही तर सदर रक्कम कारखान्याने एक रकमी शासकीय कोषागारात संबंधित आर्थिक वर्ष संपल्यानंतर एक महिन्याचे आत भरणे बंधनकारक राहील.

(२) यापुर्वी कारखान्याने रस्ते उभारणे/दुरुस्ती/संगणकीकरण या बाबींवर कारखान्याच्या स्वनिधीतून खर्च केलेला असेल तो या आदेशान्वये मंजूर केलेल्या रस्ते अनुदानाच्या रक्कमेतून समायोजित करता येणार नाही.

(३) सदर अनुदानासाठी कारखान्याने बँकेत स्वतंत्र खाते उघडून मंजूर अनुदानाची रक्कम सदरच्या खात्यात प्रथम जमा करावी.

(४) सदर योजनेतून कारखान्यास यापूर्वी संगणकासाठी अनुदान मिळालेले असल्यास व हा खर्च रु.५.०० लाखापर्यन्त झाला असल्यास या बाबींसाठी पुन्हा अनुदान खर्ची टाकू नये. संगणकीकरण यासाठी या योजनेतील अनुदानातून जास्तीत जास्त रु.५.०० लाख एवढया मर्यादेपर्यंत व एकदाच खर्च करता येईल.

(५) मंजूर अनुदान खर्च करण्यापुर्वी उपरोक्त वाचा येथील अ.क्र.३ मधील आदेशान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकार मर्यादेपेक्षा अधिक रक्कमेच्या प्रस्तावाबाबत साखर आयुक्त कार्यालयाची प्रथम तांत्रिक मंजूरी घेण्यात यावी. तसेच सदर मंजूर अनुदानातून खर्च करण्यासाठी प्रस्ताव सादर करताना सदर आदेशातील सुचनांचे तंतोतंत पालन करुन प्रचलित दर सूची विचारात घेऊन सुधारित सविस्तर प्रस्ताव,अंदाजपत्रके व इतर अनुषंगिक माहितीसह दोन प्रतीमध्ये प्रस्ताव तांत्रिक मंजुरीसाठी साखर आयुक्तालयामधील कार्यकारी अभियंता यांचेकडे सादर करण्यांत यावा.

(६) उक्त योजनेंतर्गत मंजूर झालेल्या अनुदानाचे विनियोग व त्यामधून प्रत्यक्ष किती काम पूर्ण झाले आहे. यासंबंधीच्या बाबींचा प्रगती अहवाल प्रत्येक तिमाहीत साखर आयुक्त कार्यालयास सादर करावा. तसेच सदर अहवाल साखर आयुक्त,महालेखापाल,मुंबई तसेच त्यांचे संबंधित विशेष लेखापरिक्षक वर्ग-१ (साखर), सहकारी संस्था यांना तपासणीसाठी नियमित उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

२. रु.१,८०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी ऐंशी लाख फक्त) इतकी रक्कम मुख्य लेखाशिर्ष मागणी क्रमांक व्ही-२ २४२५ सहकार , १०८,इतर सहकारी संस्थाना अर्थसहाय्य (०३) (०५) रस्ते विकासासह पायाभूत विकासासाठी सहकारी साखर कारखान्यांना सहाय्यक अनुदान ०३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (२४२५१०३६) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व सन २०१६५-१७ साठी मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर निधीचा विनियोग योग्य प्रकारे केला जात असल्याबाबतची खातरजमा करण्याची संपूर्ण जबाबदारी साखर आयुक्त कार्यालयाची राहील.

३. सदरहू अनुदानापोटी मंजूर करण्यात रु.१,८०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी ऐंशी लाख फक्त) इतक्या रक्कमेचे आहरण करुन संबंधितांना संवितरण करण्याकरिता लेखा अधिकारी,साखर आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व साखर आयुक्त,महाराष्ट्र राज्य,पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यांत येत आहे. त्यानुसार त्यांनी मंजूर केलेली रक्कम रु.१,८०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी ऐंशी लाख फक्त) जिल्हा कोषागार कार्यालय,पुणे यांचे कार्यालयामार्फत पात्र काखान्याना शासन निर्णयातील तरतुदी आणि प्रचलित नियम विचारात घेवून साखर कारखान्यांचे नावावर धनादेश काढून संबंधित कारखान्यांना वितरित करण्याची कार्यवाही करावी.

४. प्रमाणित करण्यात येते कि, या प्रकरणी शासन परिपत्रक ,वित्त विभाग , क्रमांक - अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६ व शासन परिपत्रक ,वित्त विभाग , क्रमांक - अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. ८.२.२०१७ मधील संबंधित अटींची पूर्तता झाली आहे,

५. हा शासन निर्णय शासन परिपत्रक ,वित्त विभाग , क्रमांक - शासन परिपत्रक ,वित्त विभाग , क्रमांक - अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६ व शासन परिपत्रक ,वित्त विभाग , क्रमांक - अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. ८.२.२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०३३०१७२२५०१९०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak S Desai

Digitally signed by Deepak S Desai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMT Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d11b2ee4dfa01facc6e58028a3bde93d4ac81d87ed6247ca0fb3a827602426f, cn=Deepak S Desai
Date: 2017.03.30 17:25:57 +05'30'

**( दि. शि. देसाई )**
शासनाचे उप सचिव

**प्रत रवाना:--**

१. मा. मंत्री ( सहकार ) यांचे खाजगी सचिव
२. मा. प्रधान सचिव,सहकार विभाग , मंत्रालय ,मुंबई
३. साखर आयुक्त, साखर संकुल , पुणे,
४. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, मुंबई, नागपूर,
५. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ मर्यादित,नरिमन पॉईंट, मुंबई
६. कार्यकारी संचालक, संबंधित सहकारी साखर कारखाने , साखर आयुक्त, पुणे यांच्या मार्फत.
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,

९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१०. वित्त विभाग, व्यय-२/ कराधान-३/ अर्थसंकल्प-३/ अर्थसंकल्प-१२,
११. सर्व सह सचिव/उप सचिव /अवर सचिव व कक्ष अधिकारी, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई,
१२. अवर सचिव ( अर्थसंकल्प ), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई,
१३. निवडसंग्रह (२५-स) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.